(२०)

7

**प्रशासकीय मान्यता**
दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) लोहा,जि.नांदेड
यांचेकरिता १ निवासस्थान बांधण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीआरक्यू-२४१०/१५६(५९)/का-१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:- २५ जून,२०१०.

**पहा :-** १) प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षणे-एक), मुंबई यांचे पत्र क्र .बी(डब्ल्यू)६०६३/१९९७, दिनांक ९ फेब्रुवारी,२०१०.
२) प्रमुख जिल्हा न्यायाधिश, नांदेड यांचे पत्र क्र. बांध-७३२५/२००९, दि. २४.११.२००९.

शासन निर्णय :-दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) लोहा,जि.नांदेड यांचेकरिता १ निवासस्थान बांधण्याच्या रु.११,४४,२२०/- (रुपये अकरा लक्ष, चव्वेचाळीस हजार, दोनशे वीस फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अनुक्रमांक | तपशिल | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | इमारत बांधकामाचा खर्च | ८,४७,००० |
| २ | ४% आकस्मिक खर्च | ३३,६०० |
| ३ | ८ % पाणीपुरवठा आणि मलनिस्सारण. | ६७,२०० |
| ४ | ११ % विद्युतीकरण शुल्क. | ९२,४०० |
| ५ | संभाव्य दरवाढ (१०%) | १,०४,०२० |
| | एकूण | ११,४४,२२० |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबत खातरजमा करण्यात यावी.
(ब) मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांचेकडून मंजूर करुन घेऊनच काम सुरु करावे.

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६-गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७०० इतर गृहनिर्माण (एक) न्यायदान- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-१२९/इमा-२, दि.२३.३.२०१० अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. :-विअप्र

१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( र. ग. पांचाळ )**
**कार्यासन अधिकारी.**

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण-दोन), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नांदेड,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड,
कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड,
(मुळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, लोहा, जि.नांदेड
जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड,
उप कोषागार अधिकारी,लोहा,जि.नांदेड
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय परिसर,औरंगाबाद.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
कक्ष अधिकारी, का. ११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.